पोलीस स्टेशन आवारात महिला
समुपदेशन केंद्रे स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-समुप-२०१३/प्र.क्र.८०/ का-१०**
**नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**तारीख-१७ ऑक्टोबर, २०१४.**

वाचा :-

१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.समुप-२०१२/प्र.क्र.१९/का-१०, दिनांक २७ जून, २०१२.

**प्रस्तावना -**

शासनाच्या संदर्भाधीन दि.२७ जून, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये नाशिक जिल्हयातील नाशिक तालुक्यातील समुपदेशन केंद्र तेजस्विनी महिला मार्गदर्शन व विकास केंद्र, ४, अथर्व रो हाऊस, गोविंद नगर, नाशिक यांना मंजूर करण्यात आले होते. त्याविरुध्द आदर्श महिला विकास मार्गदर्शन संस्था, नाशिक यांनी मा.न्यायालयात रिट याचिका क्र.७३२/२०१३ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा.न्यायालयाने दि.१६ एप्रिल, २०१४ रोजी निर्देश देऊन नाशिक येथे समुपदेशन केंद्र स्थापन करण्यासाठी नव्याने अर्ज मागवून नवीन संस्थेची निवड करण्याची प्रक्रिया ४ आठवडयात सुरु करण्याबाबत आदेशित केले होते. त्यानुषंगाने जिल्हास्तरीय छाननी समिती, नाशिक यांच्याकडून नाशिक तालुक्यातील समुपदेशन केंद्राकरिता नव्याने प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन सदर प्रस्ताव शासनास सादर करण्यात आले होते. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय-

नाशिक जिल्हयातील नाशिक तालुक्यातील यापूर्वी संदर्भाधिन दि.२७ जून, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये तेजस्विनी महिला मार्गदर्शन व विकास केंद्र, ४, अथर्व रो हाऊस, गोविंद नगर, नाशिक यांना मंजूर करण्यात आलेले समुपदेशन केंद्र रद्द करण्यात येऊन ते आता आदर्श महिला विकास मार्गदर्शन संस्था, नाशिक यांना मंजूर करण्यात येत आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भिय शासन निर्णयान्वये ५१ समुपदेशन केंद्रे स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदी आदर्श महिला विकास मार्गदर्शन संस्था, नाशिक या संस्थेस मंजूर करण्यात आलेल्या समुपदेशन केंद्रास लागु राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१७१२२३११२१३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vibhute Chandrakant A

Digitally signed by Vibhute Chandrakant A
DN: CN = Vibhute Chandrakant A, C = IN, S = Maharashtra, O = Government of India, OU = Women and child Department
Date: 2014.10.17 16:00:39 +05'30'

**चंद्रकांत विभूते**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, (व्यय) / (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
१४. पोलीस महासंचालक, पोलीस मुख्यालय, मुंबई.
१५. विशेष पोलीस महानिरिक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष), पुणे.
१६. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
१७. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई.
१८. महाप्रबंधक, उपलोकायुक्त व लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१९. सर्व निबंधक, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर / औरंगाबाद.
२०. सर्व जिल्हा न्यायाधीश, जिल्हा न्यायालय.
२१. सर्व जिल्हाधिकारी,

२२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

२३. राज्य समन्वयक (PPMU), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक,

२५. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई.

२६. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), नागपूर.

२७. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

३०. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.

३१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

३२. सर्व मंत्रालयीन विभाग.

३३. सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

३४. समन्वयक, महिला व बालकांचे विशेष कक्ष, टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई.

३५. परिशिष्ट-ब मधील सर्व स्वयंसेवी संस्था (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत)

३६. सर्व महिला समुपदेशन केंद्र / सेवा पुरविणारे / सर्व आश्रयगृहे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत)

३७. निवड नस्ती,का-१०.